**प्रशासकीय मान्यता**

**चंद्रपूर येथे सैनिकी शाळेच्या परीसरात एन.डी.ए इमारत,एन.सी.सी इमारत जलतरण तलाव, इनडोअर क्रिडा संकुल इ. च्या (भाग-२) बांधकामाच्या रुपये १९२ कोटी इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**शालेय शिक्षण व क्रिडा विभाग,**
**शासन निर्णय क्र. चंसैशा २०१८/ प्र.क्र.३३/ एसएम-६**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक :-१२ सप्टेंबर,२०१८**

**वाचा :**

१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, क्र. इसैशा-२०१६/प्र.क्र.९६/एसएम-६, दिनांक १३.४.२०१७

२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, क्र. चंसैशा-२०१७/प्र.क्र.५५/एसएम-६, दिनांक २२.८.२०१७

३) शिक्षणाधिकारी, जि.प. चंद्रपूर यांचे क्र. शिक्षण(माध्य)/सैशाबां/प्रमा/२६९/२०१८, दि.५.२.२०१८ चे पत्र

४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, चंद्रपूर यांचे क्र. शिक्षण/ माध्य/ सैशा/१०४३/ २०१८, दिनांक २५.५.२०१८ चे पत्र.

५) सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे क्र. बैठक-२०१८/प्र.क्र.१५२/इमा-१, दिनांक २३.८.२०१८ चे पत्र.

**प्रस्तावना :**

चंद्रपूर येथे सातारा सैनिक शाळेच्या धर्तीवर नवीन सैनिकी शाळा सुरु करण्याचा निर्णय मंत्रीमंडळाच्या दिनांक ९.४.२०१५ च्या बैठकीत घेण्यात आला आहे. चंद्रपूर जिल्हयातील चंद्रपूर, बल्लारपूर या मुख्य मार्गावर भिवकुंड येथे सैनिकी शाळा प्रस्तावित करण्यात आली आहे. चंद्रपूर सैनिकी शाळेच्या परिसराला संरक्षण भिंत व अंतर्गत रस्ते बांधकामाच्या रुपये १२.३६७७ कोटी इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास संदर्भाधीन क्र. (१) च्या शासन निर्णयान्वये तसेच सैनिकी शाळेच्या इमारतीचे व पायाभूत सुविधांचे बांधकामाच्या रुपये २९६.८६ कोटी इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास संदर्भाधीन क्र. (२) च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. शिक्षणाधिकारी, जिल्हापरिषद चंद्रपूर, जिल्हा चंद्रपूर यांनी रुपये १७३.५० कोटी इतक्या रकमेचा चंद्रपूर सैनिक शाळा येथील बांधकाम भाग-२ (अतिरिक्त कामे व बाबी ) प्रस्ताव संदर्भाधिन क्र.(३) येथील पत्रान्वये सादर केला. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद,चंद्रपूर यांनी यासंदर्भात रुपये २७७.९३ कोटी इतक्या किंमतीचे सुधारित अंदाजपत्रक संदर्भाधिन क्र.(४) येथील पत्रान्वये प्रशासकीय मान्यतेसाठी सादर केले. उच्चस्तरीय सचिव

समितीच्या दिनांक १०.०८.२०१८रोजी झालेल्या बैठकीत रुपये २७७.९३ कोटीच्या प्रस्तावातील काही बाबी कमी करुन एन.डी.ए इमारत,एन.सी.सी इमारत, जलतरण तलाव,इनडोअर क्रिडा संकुल इ.च्या (भाग-२) बांधकामाच्या रुपये १९२ कोटी इतक्या रकमेच्या प्रस्तावास मान्यता दिली आहे. त्यानुसार चंद्रपूर सैनिकी शाळा परिसरात एन.डी.ए इमारत,एन.सी.सी इमारत, जलतरण तलाव,इनडोअर क्रिडा संकुल इ.च्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

चंद्रपूर जिल्हयातील भिवकुंड, ता. बल्लारपूर येथील सैनिक शाळा परीसरात एन.डी.ए इमारत,एन.सी.सी इमारत,जलतरण तलाव,इनडोअर क्रिंडा संकुल इ. बांधकामाकरिता खालील तक्त्यामध्ये दर्शविल्याप्रमाणे रुपये १९२ कोटी ( रुपये एकशे ब्याण्णव कोटी फक्त ) इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास सचिव समितीने मान्यता प्रदान केल्यानुसार खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | कामाचे स्वरुप | प्रशासकीय मान्यता ( रुपये कोटीत ) |
|---|---|---|
| १ | चंद्रपूर भिवकुंड येथील नवीन सैनिकी शाळेच्या परीसरात एन.डी.ए इमारत,एन.सी.सी इमारत, जलतरण तलाव,इनडोअर क्रिडा संकुल इ.च्या बांधकाम करणे. (भाग -२) | १९२.०० |
| | **एकूण** | **१९२.००** |

**अटी व शर्ती** :

१) काम सुरु करण्यापूर्वी सदर अंदाजपत्रक सार्वजनिक बांधकाम विभागाचे संबंधित मुख्य अभियंता यांच्याकडून साक्षांकीत करुन घ्यावे.

२) मांडणी नकाशा व विस्तृत नकाशास वास्तू विशारदाकडून मंजूर घेऊनच काम सुरु करावे.

३) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काची पूर्तता करुन घ्यावी तसेच उपभोक्ता विभागाची स्वाक्षरी घेण्यात यावी.

४) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करते वेळेस विस्तृत अंदाजपत्रके व दरपत्रके मंजूर करुनच काम हाती घ्यावे.

५) सदर कामाचे सविस्तर संकलन तयार करुन सक्षम अधिकाऱ्यांची मंजूरी घेऊनच काम हाती घ्यावे.

६) प्रत्यक्ष काम करतेवेळी शासन निर्णय, पर्यावरण विभाग, क्र. इएनबी २०१३/ प्र.क्र. १७७/ तां.क्र.१, दिनांक १०.१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

७) प्रस्तुत कामाची एकच निविदा करुन काम हाती घ्यावे. कोणत्याही परिस्थितीत कामाचे वेगवेगळे भाग करुन काम हाती घेऊ नये.

२. सदरचा खर्च सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात " मागणी क्र. ई-४, ४२०२- शिक्षण, क्रिडा, कला, संस्कृती यावरील भांडवली खर्च, ०१ सर्वसाधारण शिक्षण, २०२- माध्यमिक शिक्षण, (०१)- सैनिकी शाळेचे बांधकाम,(०१) (०१) चंद्रपूर येथे सैनिकी शाळेचे बांधकाम, (४२०२ ६४३३), ५३ मोठी बांधकामे" या लेखाशीर्षाखाली मंजूर करण्यात येणाऱ्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. सदर निधी वितरीत करण्यासाठी आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हापरिषद,चंद्रपूर यांना या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणाऱ्या निधीकरिता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.६६३/१८/ व्यय-५, दिनांक ०८.०८.२०१८ अन्वये तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१६८/१८/ इमा-१ दिनांक २३.०८.२०१८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०९१२१५४५३९४३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700fe62cba2439a81b4be4, serialNumber=007d84f8ce44beba86b0ca2d0155d67cc1a9db4f8d59bc9d8067628d62bcdc1a, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2018.09.12 15:51:02 +05'30'

**( स्वाती म. नानल)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मुख्यमंत्री सचिवालय यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई ३२
२. सर्व विधान सभा /विधान परिषद सदस्य, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. मुख्य सचिव यांचे उप सचिव
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त ( शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
८. जिल्हाधिकारी, चंद्रपूर
९. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर,
१०. शिक्षण संचालक ( माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
११. शिक्षण संचालक ( प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१२. विभागीय शिक्षण उप संचालक,नागपूर विभाग, नागपूर
१३. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, चंद्रपूर

१४.कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. २, चंद्रपूर,
१५.शिक्षणाधिकारी ( माध्यमिक ) जिल्हा परिषद चंद्रपूर
१६.शिक्षणाधिकारी ( प्राथमिक ) जिल्हा परिषद चंद्रपूर
१७.कक्ष अधिकारी , (व्यय ५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. कक्ष अधिकारी( अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंब
१९. निवडनस्ती.

**प्रत माहितीसाठी-**

१. मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
२. मंत्री (शालेय शिक्षण) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय,मुंबई ३२
३. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ३२